E Book 138

# मुगलशैलीच्या लाल किल्ल्यावरील पेंटींगचे विश्लेषण



नमस्कार मित्रांनो,

ज्ञानवापी, ताजमहाल, मथुरा श्री कृष्ण मंदिर, कुतुबमिनार वगैरे सध्या चर्चेत आहेत. संगीत ताजमहाल, व डॉ विद्याधर ओक यांनी नव्याने सादर केलेल्या पुराव्यावर उलटसुलट चर्चा सुरू आहे. या अनुषंगाने काही वर्षांपूर्वी कोरा.कॉम वर संपर्क एका चर्चेत जस्टिन नामक व्यक्तीने ताजमहाल शिवमंदिर नाही. पुना ओक किंवा वासुदेवराव गोडबोले यांचे मुद्दे सविस्तरपणे खोडून काढले होते.

जस्टिन यांच्या मुद्यांतून निर्माण झालेल्या वैचारिकतेवर गोडबोले यांनी काही वर्षांपूर्वी

उत्तर द्यायला टाळले. मला उत्तर द्यायला सांगता तर मग तुम्हीच का उत्तर देत नाही असे म्हटले होते. म्हणून मी जस्टिन यांच्या प्रत्येक आक्षेपाला उत्तर देऊन गोडबोले पक्षी पुना ओक कसे बरोबर आहेत ते दाखवून दिले. यावर एक वेगळे ई-बुक क्र ११० सादर केले आहे.
या घटनेला बरीच वर्षे झाली. मध्यंतरीच्या काळात बरीच नवी चित्रे माहिती गोळा झाली. विविध संदर्भ फोटो जुन्या कृष्ण धवल पेक्षा रंगीत जास्त प्रभावीपणे मिडियावर सादर करायची सोय झाली.
मिपावरील धाग्यातून काही ओहापोह करायला अभ्यासू, रसिक आणि चिकित्सक वाचक मिळतात. म्हणून बऱ्याच दिवसांनी धागा प्रकट करत आहे.
संदर्भ आहे शाहजहां दरबाराचे हे एक रंगित चित्र.

मिपावरील 8836 वाचने १ ऑगस्ट २०२३ पर्यंत



हेच चित्र पुना ओक यांनी आपल्या ताजमहालवरील पुस्तकात इलस्ट्रेटेड वीकली मधून प्रकाशित झालेले कृष्ण धवल चित्र सादर केले होते.



SHAHJAHAN receives the Persian Ambassador in the Diwan-i-Aam, Red Fort, Delhi. (Mughal, c. 1628. MS Onsley, Curators of the Bodleian Library, Oxford). Delhi once again became the imperial seat when the capital was transferred from Calcutta.

त्यात मूळ चित्र दि बोडलिन लायब्ररी ऑक्सफर्ड, मधील आहे असे म्हटले आहे. शिवाय ते १६२८ सालातील दिल्ली लालकिल्ल्यातील आहे असे वीकलीच्या मजकुरातून ध्वनित होते.



हे चित्र १६२८ मधील शहाजहांच्या राज्याभिषेकानिमित्तचे आहे. ही घटना दिल्लीतील लालकिल्ल्यात घडली असावी. त्यातील राजाची बैठक मागील चित्रे, दरवाज्याची दिशा पाहता दिल्लीतील लालकिल्ला असावा.

१. आता प्रश्न निर्माण होतो की ओकांच्या पुस्तकातील चित्रातील लालकिल्ला दिल्लीचा नसेल तर कुठला असावा?

चित्र तेच पण साल बदललेले. अली मर्दान खानला शहाजहां स्वागत करत आहे असे तेच चित्र १६४० सालचे आहे असे त्या खालील संदर्भ सांगतो. ते सांगताना हे चित्र जहांगीर पादशाह नाम्यातील असेल तर जहांगीर वारल्यावर त्याच्या नाम्यात हे चित्र

१६४० सालात काढले आहे हे विसंगत वाटते.




Jehangir Padshah: Shahjahan receives Ali Mardan Khan in durbar. Mughal style, 17th century, c. 1640.

२. त्यात वर्णन केलेला तपशील व चित्र याची गल्लत आहे का?

१.ती वास्तू दिल्लीचा लालकिला का आणखी कुठला? कारण दिल्ली येथील

लालकिला १६३९ मधे बांधून पूर्ण झाला असे मानले जाते.



यातला पर्शियन दूत कोण? कानात डूल घातलेले दोघे बादशहांच्या मर्जीतील सेवक असावेत. वय, हातात काठी, पांढरट दाढीवरून मागे उभे दूत असावेत. कदाचित शाहजहां त्यांना आधीपासून ओळखत असावा. म्हणून त्यांनी हात पुढेकरून आपले मोकळेपणा दाखवत बोलावते आहे.

एका अन्य ठिकाणी मिळालेले अली मर्दान खानचे चित्र.



Portrait of Ali Mardan Khan

ही एक स्वैर अनुवादित तळटीप म्हणते, "आग्रा, लाहोर आणि दिल्ली येथे मोठ्या प्रेक्षक हॉलच्या आधीही, शाहजहान (r. 1628-58) ने त्याच्या दरबारी स्वागतासाठी नवीन प्रकारचे राजवाडा वास्तुकला म्हणून लाकडी कनातींचा दीवान ई खास प्रेक्षक हॉल बांधले.




लाकडी खांब, तुळया, व बल्ल्यांचे शोभिवंत शामियाने यातून ऐश्वर्य निर्माण करता येती याच पुस्तकात एक पिवळ्या रंगाच्या फेटेवाल्याने आपले पागोटे ढिले असल्याने त्याने उंच बसलेल्या शाहजहांकडे वर तोंड बोलले केले की ते डोक्यावरून पडायलाची भिती होती म्हणून हाताने घट्ट पकडून ठेवला आहे.

या निमित्ताने आणखी काही माहिती सादर करत आहे.
गाय आणि सिंह एकत्र पाणी पिताना दिसतात यातून सामाजिक जीवनात जनता व शासक यांचे नाते असावे काय? शिवाय आणखी काय काय सुचवले जात आहे? मागे तराजू, त्यापुढे दोन मौलवी एकाने हातात गोल वस्तू धरली आहे. ती काही खाण्याची वस्तू असावी का? दुसऱ्याच्या हातात तलवार शौर्याचे प्रतीक दाखवले असावे.



७२ पैकी काही हूरे (पऱ्या असाव्यात पण चेहरे पुरुषी वाटतात) वरून पहात आहेत...

आता संदर्भ बदललेला आहे.

आता शहाजहांचे वडील जहांगीराच्या दरबारात तो अजमेरची मोहिम फत्ते करून परतल्यावर त्याची भेट होत आहे. मुलगा बापाच्या 'पाय लागू' पोझ मधे आहे. शहाजहांनला अर्धा हिंदू मानतात, कदाचित त्याचा प्रभाव असावा. साल दर्शवले जाते १६१७

पावलांशी झुकणाऱ्या शाहजहांशिवाय गुलाबी रंगातील फोटो समान चित्रात पिताश्री अकबर किवा प्रपिता हुमायूं ? असावेत.
हिरव्या पिवळ्या चौकटीत कुठलेच सिंह किंवा कोणाचे चित्र नसून काही तरी मजकूर लिहिला आहे असे भासते.
दरवाज्याच्या पोपटी चौकटीत तिथे दार असावे असे पडद्याने सूचित होते.
हत्तीची वर्णी दर चित्रात प्रकर्षाने जाणवते. इथला हत्ती कार्टून मधील चित्राप्रमाणे हसरा वाटतो.
विविधपातळ्यांवरील सरदार आपापसात बोलाचाल करताना दिसतात यावरून राजाचा दरारा थोडा कमी किंवा आनंदाच्या प्रसंगी सलगी पुर्ण असावा असे चित्रकाराला अपेक्षित असावे.



त्यानंतर सत्ता पालट झाला व शहाजहांने राज्यरोहणाप्रसंगी आपल्या ३ मुलांना उभे शाह शुजा १२ व औरंगजेब १० वर्षाचा व शुको १३ वर्षाचा छातीशी जवळ बोलावून सर्व उपस्थितांना आपुलकी व सौहार्द दाखवत आहे असे दृश्य आहे. हे चित्र ८ मार्च १६२८चे आहे.



या चित्रात खाली चौकोनात मध्यात एका झेंड्याच्या पोस्टपाशी मौलवीं आनंदात आहेत. समावेत आधी सिंहासमावेत पाणी पिणारी गाय आता २ सिंहांच्यामधे मेलेली पडली आहे असे दिसते व २ हत्तींचे चित्र यांचा समावेश दिसतो. चौकटीच्या बाहेर दोन्ही बाजूला जे पुरुष दिसतात त्यांच्या कानात रिंगा आहेत. यावरून ते महत्वाच्या

पदावरचे किंवा शाहजहांच्या आईच्या नात्यातले असल्याने त्यांची वर्णी इतक्या जवळ लागली असावी कि काय असे वाटते.

लालकिल्ल्याबाबत चर्चा चालू आहे म्हणून ... दोन बाबींकडे लक्ष जाते...



वरील चित्र दिल्लीच्या लालकिल्याचे आहे. त्यात खंदकाच्या जागेत शहाजहांच्या मनोरंजना प्रित्यर्थ साठमारी करत हत्तींना झुंजवले जाताना दाखवले आहे. मधल्या

पातळीवर मान्यवर सरदार तिथे जमून आनंद घेत आहेत. शाहजहां आपल्या दोन मुलांसह उंच ठिकाणी बसून त्या साठमारीचा आनंद घेत आहे. आसपासच्या सज्जातून पडदे टाकून शानदानी स्त्रिया पहात असाव्यात.
यावरून मुगल राजसत्तेच्या काळात खंदक कोरडे होते. जर परकोट नुकताच बांधला गेला असेल तर यमुना नदीचे पात्रातून पाट काढून खंदक पाण्याने भरलेली ठेवला जायला पाहिजे होता. पण त्या बराच काळ आधी कदाचित नदीचे पात्र दूर गेल्याने पाटाचे पाणी तिथवर येणे शक्य होईनासे झाले असेल. यावरून बांधकाम खूप आधीपासून तयार असले पाहिजेत. या मोठमोठ्या हवेल्यात, परकोटात सुरक्षित रहिवास करणे सुलभ होते.
जी गोष्ट लाल किल्लयाची तीच ताजमहालाला लागू होते. ताजमहालातील २४ कारंजी उडवायला लागणारे पाणी मिळवायला थेट अगजी जवळ एक पाट किंवा कालवा तयार केला असेल. तिथून ते मोटालावून पाणी उपसून वर नेले गेले असले पाहिजे.



नगारखाना ही गरज मुस्लिमांचे नसावी. कारण कुराणात वाद्ये गायकी, नृत्य या कलांना बंदी होती. तरीही नगारखाने व्यवस्थित काम करत होते. ते कसे ते इथे लक्षात येते. यावरून ताजमहालातील नगारखान्याची उपयुक्तता लक्षात येते.
याशिवाय आणखी काही सूचना असतील तर स्वागत आहे.